**पदोन्नती**

जिल्हा तांत्रिक सेवेतील पदविकाधारक कनिष्ठ अभियंता (स्थापत्य) पदावरुन उप विभागीय अधिकारी (स्थापत्य) पदावर पदोन्नती व नेमणूक

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक बांधकाम विभाग
## शासन आदेश क्रमांकः पीओजी-२०१५/प्र.क्र.३३३/सेवा-२
## मंत्रालय, मुंबई
## तारीख: १९.१२.२०१६

## शासन आदेश

दिनांक १/९/२०१५ च्या निवडयादीतील जिल्हा तांत्रिक सेवेतील श्री. सुखदेव आश्राजी फुंदे, पदविकाधारक कनिष्ठ अभियंता (स्थापत्य) यांना महाराष्ट्र अभियांत्रिकी सेवा गट- “अ” मधील उप विभागीय अधिकारी (स्थापत्य) ( वेतनश्रेणी रू.१५६००-३९१०० + ग्रेड पे ५४००) पदावर या आदेशान्वये पदोन्नती देण्यात येत आहे. पदोन्नती नंतर उप विभागीय अधिकारी (स्थापत्य) म्हणून त्यांची पदस्थापना त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या ठिकाणी करण्यात येत आहे.

| अ.क्र. | जिल्हा तांत्रिक सेवेतील पदविकाधारक कनिष्ठ अभियंता यांचे नांव | पदोन्नतीचा प्रवर्ग | वाटप करण्यात आलेला विभागीय संवर्ग | पदस्थापना |
|---|---|---|---|---|
| १ | श्री. सुखदेव आश्राजी फुंदे (भ.ज.ड.) | भ.ज.ड. | औरंगाबाद | सा.बां.उप विभाग, पाटोदा |

२. श्री. सुखदेव आश्राजी फुंदे, पदविकाधारक कनिष्ठ अभियंता (स्थापत्य) यांची पदोन्नती ही, महाराष्ट्र नागरी सेवा (शिस्त व अपिल) नियम, १९७९ मधील नियम ८ व १० खाली विभागीय चौकशी चालू अथवा प्रस्तावित नसल्याच्या अटीच्या अधीन राहून करण्यात येत आहे. तथापि, सदर आदेशाच्या दिनांकास त्यांच्या विरूध्द विभागीय चौकशी चालू असल्यास त्याच्याबाबतीत हे पदोन्नती आदेश आपोआप रद्द होतील.

३. श्री.फुंदे यांना शासन अधिसूचना सामान्य प्रशासन विभाग, क्र.एसआरव्ही-२०१५/प्र.क्र.१५६/कार्या १२, दि.२८.४.२०१५ व दिनांक १६.७.२०१५ मधील तरतुदीनुसार विभागीय संवर्गाचे वाटप करण्यात आले आहे व पदोन्नतीनंतर त्यांची पदस्थापना केलेले ठिकाण/कार्यालय याबाबतचा तपशील त्यांच्या नावासमोर नमूद करण्यात आला आहे.

४. श्री. सुखदेव आश्राजी फुंदे, पदविकाधारक कनिष्ठ अभियंता (स्थापत्य) यांना देण्यात आलेली पदोन्नती ही पुढील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

१. सदर पदोन्नती ही संबंधीतांच्या वयाचे ५०/५५ व्या वर्षानंतर पुनर्विलोकन करावयाच्या शासन निर्णयातील तरतूदींच्या अधीन राहील.

५. संबंधित नियंत्रक अधिकारी यांना अशी विनंती करण्यात येते की, त्यांच्याकडे नियुक्त असलेले श्री. सुखदेव आश्राजी फुंदे, पदविकाधारक कनिष्ठ अभियंता (स्थापत्य) यांना पदोन्नतीचे व सविस्तर नियुक्तीचे आदेश निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून तात्काळ कार्यमुक्त करावे व नविन नियुक्तीच्या ठिकाणी कमीतकमी पदग्रहण अवधी घेऊन रजेवर न जाता किंवा कोणत्याही प्रकारे नियुक्ती रद्द करण्याचे अभिवेदन न करता रुजू होण्याचे आदेश द्यावेत.

६. जर श्री. सुखदेव आश्राजी फुंदे, पदविकाधारक कनिष्ठ अभियंता (स्थापत्य) हे दिनांक १९.१.२०१७ पर्यंत पदोन्नतीनंतर देण्यात आलेल्या सविस्तर नियुक्तीच्या ठिकाणी हजर झाले नाहीत तर त्यांना पदोन्नतीमध्ये स्वारस्य नाही असे गृहीत धरुन त्यांच्या पदोन्नतीचे आदेश कसलीही नोटीस न देता रद्द करण्यात येतील. याबाबत नंतर कोणत्याही अभिवेदनाचा विचार केला जाणार नाही यांची संबधितांनी कृपया नोंद घ्यावी.

७. संबंधित नियंत्रक अधिकारी यांना कळविण्यात येते की, नियुक्ती दिलेले पदोन्नत अभियंता हे दिनांक १९.१.२०१७ पर्यंत हजर न झाल्यास, त्यांचे नांव शासनास कळवावे जेणेकरुन शासनस्तरावर पुढील कार्यवाही करणे शक्य होईल.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१६१२१९१७१८१९९५१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Arvind J Kamble

Digitally signed by Arvind J Kamble
DN: CN = Arvind J Kamble, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Public Works
Date: 2016.12.19 17:22:19 +05'30'

**(अ.ज.कांबळे)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१.उप सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई पत्राने.
२.महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा) महाराष्ट्र राज्य, मुंबई,
३.महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा) महाराष्ट्र राज्य,नागपूर,

४.मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद अहमदनगर
५.मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, औरंगाबाद
६. श्री. सुखदेव आश्राजी फुंदे, पदविकाधारक कनिष्ठ अभियंता (स्था) यांना संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी यांचेमार्फत
७. मा. मंत्री / मा.राज्यमंत्री (सार्वजनिक बांधकाम) यांचे खाजगी सचिव,
८. प्रधान सचिव (सा.बां.) यांचे स्वीय सहाय्यक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
९.सचिव (रस्ते/बांधकामे) यांचे स्वीय सहाय्यक , सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,
१०.कार्यासन सेवा-१, सेवा-३,आस्थापना- १/३, सेवा-६, संगणक कक्ष, सा.बां.विभाग,मंत्रालय, मुंबई
११. कार्यासन सेवा-२ (निवडनस्ती) सार्वजनिक बांधकाम विभाग,मंत्रालय,मुंबई,